कोषागार/उप कोषागार सुरक्षा कक्षात पैशांच्या पेटयांच्या दुहेरी किल्ल्यांचा मोहोरबंद लखोटा ठेवणेबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक एफएनआर-1096/प्र.क्र.29/96/विनियम,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 11 फेब्रुवारी 1999.

पहा :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक एफएनआर-1093/प्र.क्र.43/93/विनियम, दिनांक 17 नोव्हेंबर 1994.

शासन निर्णय :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक एफएनआर-1093/प्र.क्र.43/93/विनियम, दिनांक 17 नोव्हेंबर 1994 अन्वये जिल्हा कोषागार व उप कोषागार कार्यालयातील सुरक्षा कक्षात ठेवण्यात आलेल्या मौल्यवान वस्तु/दुहेरी किल्ल्यांचे मोहोरबंद लखोटे विहित मुदतीनंतर काढून न नेणा-या/योग्य वेळी मुदतवाढ न घेणा-या संबंधित कर्मचारी/अधिकारी यांच्या विरुध्द विभागीय चौकशीव्दारे जबाबदारी निश्चित करुन दोषी आढळलेले अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून मौल्यवान वस्तु/लखोटे सुरक्षा कक्षात विना परवानगी ठेवल्याच्या कालावधीकरिता प्रतिमास शंभर रुपये याप्रमाणे दंडाच्या रुपाने वसूल करण्यात यावेत, असे आदेश काढण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, 1979 मध्ये दंड ही शिक्षा विहित केलेली नसल्यामुळे दिनांक 17 नोव्हेंबर 1994 च्या शासन परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या या आदेशात बदल करण्यात येत असून, पुढीलप्रमाणे सुधारित निर्णय आदेश देण्यात येत आहेत :-

(1) संदर्भाधीन दिनांक 17 नोव्हेंबर 1994 च्या शासन परिपत्रकानुसार संबंधित कर्मचारी/अधिकारी यांच्या विरुध्द विभागीय चौकशी सुरु करुन, त्या आधारे दंड भरण्याची शिक्षा देण्यात आलेली असेल तर, दंड देण्याची शिक्षा रद्द करुन, विभागीय चौकशी नियमान्वये विहित केलेली योग्य ती शिक्षा संबंधितांना देण्याचे आदेश काढावेत. तसेच दंड रुपाने वसूल करण्यात आलेली रक्कम संबंधितांना परत करावी.

(2) कोषागार/उप कोषागार कार्यालयातील सुरक्षा कक्षेत ठेवण्यात आलेल्या वस्तूंची मुदत संपण्याच्या एक महिना आधी पूर्वसूचना देऊनही, संबंधित कार्यालयाने मुदतवाढ घेण्याची किंवा वस्तू कोषागारातून काढून घेण्याची कार्यवाही वेळीच केली नाही तर, अशा वस्तु/लखोटे कोषागार कार्यालयातील जबाबदार व्यक्तीमार्फत कोषागार कार्यालयातील अन्य कामकाजावर परिणाम होणार नाही अशा दिवशी/वेळी संबंधित कार्यालय प्रमुख यांच्याकडे पोच घेऊन सुपूर्द करण्यात याव्यात. वस्तू संबंधित कार्यालय प्रमुखांकडे परत करण्याचा निर्णय कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी यांच्या स्तरावर घेण्यात यावा. अशा वस्तू कोषागारात वाहन उपलब्ध असल्यास त्या वाहनातून, वाहन उपलब्ध नसल्यास, पर्यायी व्यवस्था करुन सुपूर्द कराव्यात व यासाठी होणारा खर्च कोषागार कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चातून भागविण्यात यावा. अशा प्रकारे कोषागार कार्यालयांनी परत केलेल्या वस्तु/लखोटे स्वीकारणे कार्यालय प्रमुखांवर बंधनकारक आहे.

(3) कोषागार/उप कोषागार सुरक्षा कक्षात ठेवलेल्या मौल्यवान वस्तु/मोहोरबंद लखोटे यांची मुदतवाढ घेण्याची किंवा मुदत संपताच कोषागार कार्यालयातून त्या वस्तू काढून घेण्याची कार्यवाही वेळीच न करणा-या कार्यालयांना प्रत्येक प्रकरणी रु. 500/-, इतका दंड करण्यात यावा व हा दंड कोषागार कार्यालयात भरल्याशिवाय त्या कार्यालयाच्या कोणत्याही मौल्यवान वस्तु/मोहोरबंद लखोटे कोषागार कार्यालयाने स्वीकारु नयेत. दंड आकारण्याबाबतचा हा निर्णय दिनांक 1 एप्रिल 1999 रोजी किंवा त्यानंतर मुदत संपणा-या, तसेच ठेवण्यात येणा-या मौल्यवान वस्तु/मोहोरबंद लखोटे यांच्याबाबत लागू असेल. दंडाची रक्कम लेखाशीर्ष "0070-इतर प्रशासकीय सेवा-60 इतर सेवा-800 इतर जमा" याखाली जमा करावी.

(4) मौल्यवान वस्तु/मोहोरबंद लखोटे विहित मुदतीत काढून न नेण्यास, मुदतवाढ न घेण्यास जबाबदार असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्द संबंधित शिस्तभंग प्राधिकाऱ्यांनी नियमानुसार योग्य ती कारवाई करावी.

(कृ.मा.प.

कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी यांनी शासकीय कार्यालयांव्यतिरिक्त अन्य कार्यालयांनी कोषागार सुरक्षा कक्षात वस्तु/लखोटे ठेवले असतील किंवा पुढे ठेवतील, त्यांच्याही, या आदेशाच्या तरतुदी लेखी स्वरुपात नजरेस आणून द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वि. रा. शिरसाट,
शासनाचे अवर सचिव.

प्रति

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे / मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, गादाग कामा रोड, मुंबई,
* प्रमुख न्यायाधीश, कुटुंब न्यायालय, नागपूर/मुंबई, वांद्रे, मुंबई 400 051,
उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली 110 001,
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

* पत्राने.